उप सचिव पदावरुन अवर सचिव पदावर पदावनत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : उसप-१३१७/प्र.क्र.५/का.१४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय,
मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ३१.०५.२०१७

**पहा** :- १) शासन आदेश क्र.उसप १३१४/प्र.क्र.६०/का.१४, दि.२८.११.२०१४
२) शासन आदेश क्र.उसप-१३१६/प्र.क्र.६०/का.१४, दि.०१.१२.२०१४
३) शासन आदेश क्र.उसप-१३१६/प्र.क्र.६०/का.१४, दि.०१.१२.२०१४
४) शासन आदेश क्र.उसप-१३१५/प्र.क्र.१२९/का.१४, दि.३१.०८.२०१६
५) शासन परिपत्रक क्र.असज्ये १२१७/प्र.क्र.५२/का.१४, दि.३१.०३.२०१७

**आदेश**

खालील नमूद अधिकाऱ्यांना संदर्भ क्र.१ ते ४ येथील आदेशान्वये उप सचिव पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात आली होती.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | जाती प्रवर्ग | सध्याचा विभाग |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.म.द.जाधव | अ.ज. | ग्राम विकास व जलसंधारण विभाग |
| २ | श्री.ब.शे.मांडवे | अ.ज. | कौशल्य विकास व उद्योजकता विभाग |
| ३ | श्री.अ.ना.वळवी | अ.ज. | सामान्य प्रशासन विभाग |
| ४ | श्री.प्र.ब.सुरवसे | अ.ज. | सार्वजनिक बांधकाम विभाग |
| ५ | श्री.श्या.र.चौरे | अ.ज. | अल्पसंख्याक विकास विभाग |

२. उपरोक्त अधिकाऱ्यांपैकी अ.क्र.१ येथील श्री.म.द.जाधव हे उप सचिव पदावरील तदर्थ पदोन्नतीसाठीच्या सन २०१५-१६ च्या निवडसूचीवर पात्र ठरल्याने त्यांना संदर्भाधीन क्र.४ येथील आदेशान्वये उप सचिव पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात आली होती. तसेच अ.क्र.२ ते ४ येथील सर्वश्री ब.शे.मांडवे, अ.ना.वळवी, प्र.ब.सुरवसे व श्या.र.चौरे हे उप सचिव पदावरील तदर्थ पदोन्नतीसाठीच्या सन २०१४-१५ च्या निवडसूचीवर पात्र ठरल्याने त्यांना संदर्भाधीन क्र.१ ते ३ येथील आदेशान्वये उप सचिव पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात आली होती.

३. सिटी टॉवर प्रकरणातील श्री.भा.र.गावीत व इतर यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज क्र.२९६/२०१५ दाखल केला होता. सदर प्रकरणी दि.०९.०२.२०१६ व दि.२८.०३.२०१६ रोजी झालेल्या सुनावणीमध्ये मा.न्यायाधिकरणाने दिलेल्या निदेशास अनुसरुन या प्रकरणातील अधिकाऱ्यांना अवर सचिव/ उप सचिव पदावरील पदोन्नतीचा दिनांक देण्यात आले आहेत. त्यास अनुसरुन संदर्भाधीन क्र.५ येथील परिपत्रकान्वये अवर सचिव संवर्गातील अधिकाऱ्यांची दि.०१.०१.२०१२ ते दि.०१.०१.२०१६ या कालावधीची तात्पुरती ज्येष्ठतासूची प्रसिध्द करण्यात आली आहे.

४. सदर ज्येष्ठतासूचीत सर्वश्री. म.द.जाधव, ब.शे.मांडवे, अ.ना.वळवी, प्र.ब.सुरवसे व श्या.र.चौरे या अधिकाऱ्यांची ज्येष्ठता निश्चित केल्यानुसार श्री. म.द.जाधव हे उप सचिव पदावरील तदर्थ पदोन्नतीच्या सन २०१५-१६ च्या निवडसूचीच्या व ब.शे.मांडवे, अ.ना.वळवी, प्र.ब.सुरवसे व श्या.र.चौरे हे अधिकारी सन २०१४-१५ च्या निवडसूचीच्या विचारक्षेत्राबाहेर गेल्याने सर्वश्री. म.द.जाधव, ब.शे.मांडवे, अ.ना.वळवी, प्र.ब.सुरवसे व श्या.र.चौरे या अधिकाऱ्यांना दि.३१.०५.२०१७ (म.नं) पासून अवर सचिव पदावर पदावनत करण्यात येत आहे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५३१२००२०३९१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Andhra Pradesh, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2017.05.31 20:07:09 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२) मा.मुख्यमंत्र्यांचे अ.मु.स.
३) अ.मु.स (सेवा), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई
४) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
५) अ.मु.स./प्रधान सचिव/ सचिव - सर्व संबंधित मंत्रालयीन विभाग
६) सह/उप सचिव (आस्थापना) - सर्व संबंधित मंत्रालयीन विभाग
७) संबंधित अधिकारी , विभागामार्फत
८) निवड नस्ती कार्या.१४